**महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळास पणन व्यवस्थेमध्ये सुधारणा करण्यास्तव टर्मिनल मार्केटसाठी उपलब्ध करुन दिलेल्या जागांवर पणन विषयक सुविधांची उभारणी करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : कृपम-०३२३/प्र.क्र.११५/२१स,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १७ मे, २०२३

वाचा- १. शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग, क्र. ऑईल-१०-२००१/प्र.क्र.१७/११-स दि. १४.०१.२००२
२. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. कृबास २००३/प्र.क्र.३००/११- स दि. १५.०४.२००६
३. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,क्र. कृबास २००३/प्र.क्र.३००/११- स दि. २१.०९.२००७
४. शासन ज्ञापन, महसूल व वन विभाग, क्र. जमीन २७०३/प्र.क्र.१२०/ ज-४दि.१२.९.२००७
५. शासन ज्ञापन, महसूल व वन विभाग, क्र. जमीन २७१२/प्र.क्र.२५०/ ज-४ दि.१६.३.२०१३
६. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. जमीन२०१६/प्र.क्र.१३२/ ज-८ दि.७.७.२०१६

प्रस्तावना-

फळे व भाजीपाल्याच्या पणन व्यवस्थेमध्ये सुधारणा करण्यासाठी राज्यात बंगलोरच्या धर्तीवर एन.डी.डी.बी. मार्फत मुंबई, औरंगाबाद किंवा जालना व नागपूर येथे फळे व भाजीपाला मार्केट उभारणीस संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

सन २००६ व सन २००९ मध्ये केंद्र शासनाने सर्व राज्यात सार्वजनिक खाजगी भागीदारी तत्वावर टर्मिनल मार्केट उभारण्याबाबत दिलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार, संदर्भाधीन २ व ३ येथील शासन निर्णयान्वये राज्यात टर्मिनल मार्केट प्रकल्प कार्यान्वित करण्यासाठी राज्यस्तरीय समिती गठीत करण्यात आली होती.

केंद्र शासनाच्या टर्मिनल मार्केट उभारण्याबाबतच्या मार्गदर्शक सूचनांनुसार संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मान्यता दिलेल्या फळे व भाजीपाला मार्केट ऐवजी टर्मिनल मार्केटच्या उभारणीसाठी महसूल व वन विभागाने संदर्भ क्र.४ व ५ येथील ज्ञापनांन्वये मौजे बापगाव ता.भिवंडी, जि.ठाणे येथील स.नं.११८ अ पैकी ३६.७५ हे.आर.एवढी शासकीय जमीन तसेच, संदर्भ क्र.६ येथील ज्ञापनान्वये मौजा काळडोंगरी, ता.नागपूर (ग्रा) जि.नागपूर येथील गट क्र.१२३ येथील ४० हे.आर एवढी शासकीय जमीन महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळास मंजूर केली आहे.

टर्मिनल मार्केट उभारणीकरीता प्रतिसाद मिळत नसल्यामुळे संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये गठीत राज्य स्तरीय समितीच्या दि.१०.९.२०१८ रोजीच्या बैठकीत, मौजे बापगाव ता.भिवंडी, जि.ठाणे व मौजा काळडोंगरी, ता.नागपूर (ग्रा) जि.नागपूर येथील शासकीय जागेवर संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयानुसार पणन मंडळामार्फत अथवा भागिदारी तत्वावर आवश्यकतेप्रमाणे पणन विषयक सुविधा प्रकल्प उभा करण्यास मान्यता दिली आहे.

पणन सुविधा उभारणीशी निगडीत “टर्मिनल मार्केट” ही संकल्पना केंद्र शासनाची होती. या योजनेतून आर्थिक संसाधन उपलब्ध होत नसल्यामुळे केंद्र शासनाच्या सदर योजनेस प्रतिसाद मिळालेला नसल्याची वस्तुस्थिती विचारात घेता, पणन सुविधा उभारणीच्या ज्या उद्देशाने महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळास मौजे बापगाव, ता. भिवंडी, जिल्हा ठाणे व मौजे काळडोंगरी ता.नागपूर (ग्रा) जि.नागपूर येथील शासकीय जागा देण्यात आल्या होत्या, तो मूळ उद्देश न बदलता, सदर जागांवर पणन विषयक सुविधा उभारल्यास , शेतकऱ्यांच्या मालाचे काढणीपश्चात होणारे नुकसान कमी होऊन, त्यांच्या शेतमालास वाजवी दर मिळेल व ग्राहकांना चांगल्या प्रतीचा माल कमी किंमतीत उपलब्ध होऊ शकेल तसेच, शेतकऱ्यांच्या उत्पन्नात वाढ होण्यास मदत होईल. ही बाब विचारात घेता, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळाकडे उपलब्ध असलेल्या मौजे बापगाव ता.भिवंडी, जि.ठाणे व मौजा काळडोंगरी, ता.नागपूर (ग्रा) जि.नागपूर येथील जागांवर पणन विषयक सुविधांची उभारणी करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** -

पणन व्यवस्थेमध्ये सुधारणा करण्यासाठी संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये फळे व भाजीपाला मार्केट /टर्मिनल मार्केटसाठी महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळास संदर्भ क्र. ४,५ व ६ येथील शासन ज्ञापन/ शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन दिलेल्या मौजे बापगाव ता.भिवंडी, जि.ठाणे व मौजा काळडोंगरी, ता.नागपूर (ग्रा) जि. नागपूर येथील जागांवर खालील अटींच्या अधीन राहून पणन विषयक सुविधांची उभारणी करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

१) महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळाने सल्लागार नियुक्त करुन, मौजे बापगाव ता.भिवंडी, जि.ठाणे व मौजा काळडोंगरी, ता.नागपूर (ग्रा) जि.नागपूर येथील जागांवर पणन विषयक सुविधा निर्माण करण्याच्या अनुषंगाने प्रकल्प अहवाल तयार करुन शासन मान्यतेसाठी सादर करावा.

२) महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळाने स्वत: प्रकल्प उभारण्यास तसेच आवश्यकतेनुसार, बाजार समिती, वखार महामंडळ इ. संस्था यांच्याशी भागीदारी करण्यास तसेच, खाजगी गुंतवणुकदार यांनी तयारी दर्शविल्यास त्यांचाही सहभाग करुन घेण्यास मान्यता दर्शविण्यात येत आहे.

२. टर्मिनल मार्केट उभारणीकरीता प्रतिसाद मिळत नसल्यामुळे, संदर्भ क्र.२ व ३ येथील शासन निर्णयान्वये टर्मिनल मार्केटसाठी नेमलेल्या राज्य स्तरीय समितीची आता आवश्यकता राहिलेली नसल्याने, संदर्भ क्र.२ व ३ येथील शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत आहेत.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०५१७११४९१२४६०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUGRIV SAMBHAJI DHAPATE

Digitally signed by SUGRIV SAMBHAJI DHAPATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FC102DE27DC1B41E747AC6CB8491C4209459C3CF340720EA98FD1D95B19C9F65, cn=SUGRIV SAMBHAJI DHAPATE
Date: 2023.05.17 11:51:12 +05'30'

**( डॉ. सुग्रीव धपाटे )**

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

२. अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव, (कृषी), कृषि व पदूम विभाग, मंत्रालय, मुंबई
४. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई
५. विभागीय आयुक्त,नागपूर
६. जिल्हाधिकारी, ठाणे
७. जिल्हाधिकारी, नागपूर
८. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळ, पुणे
१०. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, सहकारी संस्था , कोकण विभाग, नवी मुंबई
११.विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, सहकारी संस्था , नागपूर विभाग
१२.जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था, ठाणे
१३.जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था, नागपूर
१४.निवड नस्ती- कार्यासन २१ स.